केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियान
धरणगाव नगरपरिषदेच्या पाणीपुरवठा
प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
(रु. ३९.६९ कोटी)

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक अमृत-२०२५/प्र.क्र.१११/नवि-३३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
**दिनांक : २२ मे, २०२५**

संदर्भ :-

१. केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत अमृत २.० अभियानाच्या ऑक्टोबर, २०२१ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना
२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र: ग्रापाधो-२०२१/ प्र.क्र.१२२/पापु-०६, दिनांक २९ जून, २०२२
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: अमृत २०२२/प्र. क्र.१४१/नवि- ३३, दिनांक १४ जुलै, २०२२.
४. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र : अमृत २०२२/प्र.क्र.२०३/नवि- ३३, दिनांक १६ सप्टेंबर, २०२२.
५. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र : अमृत २०२३/प्र.क्र.३३१/नवि- ३३, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०२३.
६. नगर विकास विभाग शासन निर्णय क्र: अमृत-२०२४/प्र.क्र.८३/नवि-३३, दिनांक ०७ मार्च, २०२४.
७. नगर विकास विभाग शासन निर्णय क्र: अमृत-२०२४/प्र.क्र.२०१/नवि-३३, दिनांक १३ मार्च, २०२४.
८. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक विभाग यांचे तांत्रिक मान्यतेचे आदेश क्र.मजीप्रा/नाशिक/चिशा/९११/२०२५, दिनांक ११ मार्च, २०२५.
९. अमृत २.० अभियानांतर्गत गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय तांत्रिक मान्यता समितीच्या दिनांक १३ मार्च, २०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानाची संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ वर्षापासून राज्यामध्ये अंमलबजावणी करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत पाणीपुरवठा, सरोवरांचे पुनरुज्जीवन व हरित क्षेत्र विकास इ. पायाभूत सुविधांची निर्मिती राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये करण्यात येणार आहे आणि यापूर्वीच्या अमृत अभियानांतर्गत समाविष्ट असलेल्या राज्यातील ४४ शहरांमध्ये मलनि:स्सारणाची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. त्यानुसार सदर अभियानांतर्गत राज्याच्या रु. २७७९३ कोटी प्रकल्प किंमतीच्या राज्य जलकृती आराखडयास (फक्त Capex किंमत) केंद्र शासनाने मान्यता दिलेली आहे. यामध्ये धरणगाव नगरपरिषदेच्या पाणीपुरवठा प्रकल्पाचा समावेश असून संदर्भाधिन क्र. ८ अन्वये मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार

त्यास राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या दिनांक १३ मार्च, २०२५ रोजीच्या बैठकीत मंजूरी दिलेली आहे. सदर प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानांतर्गत धरणगाव नगरपरिषदेच्या रु. ३९.६९ कोटी प्रकल्प किंमतीच्या पाणीपुरवठा प्रकल्पास परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद केलेल्या विवरणपत्रात नमूद केल्यानुसार व मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक विभाग यांनी दिनांक ११ मार्च, २०२५ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या तांत्रिक मान्यतेमधील अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्पाच्या वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे:

**(रु.कोटीमध्ये)**

| **नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव** | **प्रकल्प किंमत** | **केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ५० % )** | **राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ४५ %)** | **नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या ०५ %)** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| धरणगाव नगरपरिषद | **३९.६९** | **१९.८४५** | **१७.८६०** | **१.९८५** |

२. धरणगाव नगरपरिषदेच्या पाणीपुरवठा प्रकल्पातील घटक व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे.

| **Sr. No.** | **Type of Work** | **Amount** |
|---|---|---|
| | Civil Part (A) | |
| 1 | Working Survey (24 km) | 60000 |
| 2 | Intake Well (Dia.= 3 m, Depth = 9.30 m from ) | 1497335 |
| 3 | Inspection Well - 1st (Dia. 2 m, Depth = 7.6 m) | 628777 |
| 4 | Inspection Well - 2nd (Dia,= 2 m, Depth = 14.6 m) | 1265194 |
| 5 | Connecting Pipe (Dia - 600 m, Length- 90m) | 11184469 |
| 6 | Turning Platform & Panel Room | 2428745 |
| 7 | Approach Road at Tapi H/W 350 m | 3770491 |
| 8 | Chain Link Fencing 1.6 M. height L-168 m for ESRs | 1148678 |
| 9 | Compound Wall for Solar L = 200 m | 2178026 |
| 10 | Raw Water Rising Main( 400 mm dia DI K-9, L= 18.649 m ) | 172832814 |
| 11 | Repairing To Ext.WTP 8.0 MLD At Dharangaon (Civil Works) | 4324936 |
| 12 | RCC ESRS @1.Prop. Near Teli Talav 3.90 LL & 20.00 Mtr Stg | 6887718 |
| 13 | Pure Water Rising Main WTP to ESR DI K-9 200 mm L=1800 m | 8207677 |
| 14 | Distribution System ( HDPE 110 mm to 250 mm Total L=4169 m.) | 14248183 |
| 15 | Road Reinstatement (4.919 km) | 12272489 |
| 16 | House Service Connection (2870 nos) | 8297310 |
| 17 | Ultrasonic Water Meter: 2030 Nos. For Vidyut Nagar ESR | 26178154 |
| 18 | Trial Run for 3 Month | 5190023 |
| 19 | National Highway/State Highway Permission for RMs & LMs | 5307500 |
| 20 | Electrical Pole shifting | 5000000 |
| | MECHANICAL PART ( B) | |
| 1 | Raw Water Pumping Machinery at Head works 170 HP (2W+ 1S) Q=60 LPS Head- 125m | 21192955 |

| Sr. No. | Type of Work | Amount |
|---|---|---|
| 2 | Pure Water Pumping Machinery 15 HP (1W+1S) for Proposed Teli Talav ESR | 534132 |
| 3 | Pure Water Pumping Machinery for Exist. WTP ESR 30 HP (1W +1S) | 3598952 |
| 4 | Pure Water Pumping Machinery for Exist .NP ESR 40 HP (1W +1S) | 4178449 |
| 5 | Simple Automation | 1789689 |
| 6 | Repairs to Exiting B MLD WTP (Mechanical Work) | 880513 |
| 8 | Solar Power Plant-225 KWP | 8281684 |
| | Total | 333364893 |
| | 18 % GST | 60005681 |
| | 1 % TS | 3333649 |
| | 1% Labour Insurance | 203853 |
| | Grand Total | 396908076 |
| | **Say Rs** | **39.69 Cr.** |
| प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी कार्यादेश दिनांकापासून १८ महिने | | |

३. धरणगाव नगरपरिषदेच्या सदर पाणीपुरवठा प्रकल्पाची Opex किंमत धरणगाव नगरपरिषदेने उभारणे आवश्यक आहे. सदर प्रकल्प पुर्ण करण्याचा कालावधी १८ महिने राहील.

४. धरणगाव नगरपरिषदेच्या पाणीपुरवठा प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे: -

४.१. सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा धरणगाव नगरपरिषद राहील.

४.२. प्रकल्पासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा धरणगाव नगरपरिषदेमार्फत भरण्यात यावा.

४.३. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन शासन निर्णयानुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.४. सदर प्रकल्पास मान्यता देताना राज्यस्तरीय तांत्रिक समितीने विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

४.५. राज्य शासनाने संदर्भाधिन क्र. २ व ३ नुसार विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया व अंमलबजाअकोला विहित कालावधीमध्ये पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील. तसेच, या प्रकल्पासाठी डी. आय. पाईप्ससह सर्व प्रकारच्या पाईप्सचा देखील निविदेत समावेश करण्यात यावा.

४.६. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने केंद्र पुरस्कृत अमृत २.० अभियानातील पाणीपुरवठा व मलनि:स्सारण प्रकल्पांसाठी निर्गमित केलेल्या आदर्श निविदा पुस्तिकेनुसार प्रसिध्द करणे बंधनकारक राहील.

४.७. सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश प्रशासकीय मंजूरीच्या आदेशापासून ४५ दिवसांच्या आत देण्यात येतील याची कार्यान्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४.८. केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत केंद्र शासनाने विहित केलेल्या सुधारणांची (Reforms) पूर्तता विहित कालावधीत पूर्ण करणे संबंधित अभियान शहरास बंधनकारक राहील.

४.९. निधी वितरणाची कार्यपद्धती : केद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार केंद्र शासन हिश्याचा निधी हा तीन टप्यात (२० %+४० %+ ४० %) वितरीत केला जाणार आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य हिश्याचा निधी केंद्र हिस्सा वितरीत करताना सोबत वितरीत केला जाईल.

४.१०. अमृत अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना नागरी स्थानिक स्वराज संस्थांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या वित्त आयोगाच्या निधीशी सांगड (Convergence) घालणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी वित्त आयोगातून मिळणारा निधी चिन्हांकीत करून ठेवावा.

४.११. सदर अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सदर प्रकल्पासाठी वितरीत करण्यात येणारा निधी हा कार्यात्मक साध्यांवर (Functional Outcome) आधारित असणार आहे. तसेच, सदर कार्यात्मक परिणामाची पूर्तता न झाल्यास सदर प्रकल्पास निधी वितरीत करण्यात येणार नाही. सदर बाबींची पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी मुख्याधिकारी, धरणगाव नगरपरिषद यांची राहील.

४.१२. सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्याचा प्रथम हप्त्याचा निधी कार्यादेश निर्गमित केल्यानंतर धरणगाव नगरपरिषदेस वितरीत करण्यात येईल. त्यानुसार केंद्र शासनाने विहित केल्यानुसार उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर केल्यानंतर व कार्यात्मक साध्यांची पूर्तता केल्यानंतर पुढील हप्त्याचा केंद्र हिश्याचा व त्याप्रमाणात राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४.१३. अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्था हिश्याचा निधी उभा करून सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात शासनास सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

४.१४. सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाने वितरीत निधीच्या प्रमाणात धरणगाव नगरपरिषदेने निधी उभारणे अनिवार्य राहील. सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

४.१५. राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाच्या शासन निर्णय क्र.ग्रापाधो-२०२१/प्र.क्र.१२२/पापु-०६, दिनांक २९ जून, २०२२ मध्ये नमुद कारणा व्यतिरिक्त वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

४.१६. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीत पूर्ण करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यान्वयन यंत्रणा, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार व प्रकल्प विकास व व्यवस्थापन सल्लागार यांची संयुक्तरीत्या राहील.

४.१७. प्रकल्पाचे काम सुरु झाल्यानंतर प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केल्यानंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१८. अमृत २.० अभियानांतर्गत मार्गदर्शक सूचनेनुसार संदर्भाधिन क्र. ०३ नुसार सदर प्रकल्पासाठी प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराची नेमणूक करावी. त्यामध्ये नमूद केल्यानूसार प्रकल्प व्यवस्थापक शुल्क अदा करावे तसा ठराव संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करणे बंधनकारक राहील.

४.१९. सदर प्रकल्पासाठी आवश्यक स्वहिश्याच्या निधीची तरतूद करून, पाणीपुरवठा पप्रकल्पासाठी आवश्यक अंतिम टप्प्यासाठी पाणी आरक्षण सक्षम प्राधिकाऱ्याकडून उपलब्ध असल्याची खातरजमा करून, प्रकल्पासाठी आवश्यक परवानग्या घेऊन व प्रकल्पातील उपांगाच्या जागा नगरपरिषदेच्या नावावर व ताब्यात असल्याची तसेच, प्रकल्प राबविण्यासाठी आवश्यक इतर तांत्रिक बाबींची पूर्तता झाल्याची खातरजमा मुख्याधिकारी, धरणगाव नगरपरिषद यांनी करावी.

४.२०. प्रकल्प शाश्वत होण्याच्या अनुषंगाने सदर प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये नमूद केलेप्रमाणे पाणीपुरवठा कराची आकारणी करणेबाबत महासभेची मान्यता घेऊन त्याअनुषंगाने आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

४.२१. धरणगाव नगरपरिषदेस यापूर्वी युआयडीएसएसएमटी/ अमृत अथवा इतर कोणत्याही योजनेंतर्गत मंजुर करण्यात आलेल्या प्रकल्पातील उपांगे व या प्रकल्पातील उपांगे यामध्ये व्दिरुक्ती (Duplication) होत नसल्याची खातरजमा करण्याची जबाबादरी संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्था, या प्रकल्पाचे व्यवस्थापन सल्लागार व PDMC यांची राहील.

५. केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियांनाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या सर्व मार्गदर्शक सुचना धरणगाव नगरपरिषदेच्या पाणीपुरवठा प्रकल्पास लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२२१३१४२६९७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by SACHIN DATTATRAY SAHASRABUDDHE
Date: 2025.05.22 13:15:06 +05'30'

**(सचिन द. सहस्त्रबुध्दे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) विभाग यांचे खाजगी सचिव.
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक.
५. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक.
६. प्रधान सचिव, पाणीपुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक.
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. आयुक्त तथा संचालक, नगरपंचायत प्रशासन संचालनालय, मुंबई.
१०. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई.
११. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग.
१२. जिल्हाधिकारी, जळगांव.
१३. जिल्हा प्रशासन अधिकारी, जळगांव.
१४. मुख्याधिकारी, धरणगाव नगरपरिषद.
१५. निवड नस्ती, नवि-३३.